प्रकाश इन्स्टियुट ऑफ सायनसेस ॲन्ड रिसर्च महाविद्यालय उरण-इस्लामपूर, ता. वाळवा, जि. सांगली या प्रशिक्षण संस्थेतील एम.बी.बी.एस. अभ्यासक्रमाच्या विद्यार्थ्यांना शैक्षणिक प्रयोजनार्थ प्रात्यक्षिक अनुभवाकरिता सांगली येथील ७ प्राथमिक आरोग्य केंद्रातील प्रत्येकी ६ खाटा वापरण्यास परवानगी देण्याबाबत........

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः प्राअप -२०१८ /प्र.क्र. ०४/आरोग्य-४**

मंत्रालय, १० वा मजला, संकुल इमारत,
गो.ते.रुग्णालय आवार, मुंबई-४०० ००१.
तारीख: १९ सप्टेंबर, २०१८.

वाचा

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.एचएसजी १६९०/प्र.क्र.९६/आरोग्य-३, दिनांक- ०३.०८.१९९०.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.संकिर्ण २०१३/प्र.क्र.३०७/आरोग्य-३, दिनांक- ०३.०८.२०१३.
३) शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधि द्रव्ये विभाग, क्र.एमईडी-२०१४/प्र.क्र.१४/ १४/शिक्षण-१, दिनांक- १९.०९.२०१६.
४) सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्रमांक- संआसे/कक्ष-३/टे-१/प्रात्य. अनुभव/परवानगी/प्राचार्य, प्रकाश इस्टीटयुट ऑफ मेडिकल सायन्सेस ॲन्ड रिसर्च/परवानगी/३६०४७.५०/१७, दि.०६.१२.२०१७.

प्रस्तावना

प्रकाश इन्स्टियुट ऑफ सायनसेस ॲन्ड रिसर्च महाविद्यालय उरण-इस्लामपूर, ता. वाळवा, जि. सांगली येथील एम.बी.बी.एस. अभ्यासक्रमाच्या विद्यार्थ्यांना प्रत्येक प्राथमिक आरोग्य केंद्रातील खाटा प्रात्यक्षिक अनुभवाकरीता वापरण्यास परवानगी देण्याबाबतचा संचालक, आरोग्य सेवा यांचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत खालील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

शासन निर्णय

प्रकाश इन्स्टियुट ऑफ सायनसेस ॲन्ड रिसर्च महाविद्यालय उरण-इस्लामपूर, ता. वाळवा, जि. सांगली येथील एम.बी.बी.एस. अभ्यासक्रमाच्या विद्यार्थ्यांना प्राथमिक आरोग्य केंद्र कामेरी, वाळवा, पेठ, कासेगांव, बावची, कुरळप व येडेमच्छिंद्र, ता. वाळवा, जि. सांगली येथील प्रत्येक प्राथमिक आरोग्य

केंद्रातील ६ खाटा प्रत्याक्षिक अनुभवाकरीता वापरण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१) शासन निर्णय दि.०३.०८.२०१३ नुसार खाटांसाठी आकारावयाचे शुल्क रुपये १५०/- प्रति दिन प्रति खाटा याप्रमाणे संस्था दर तिमाहीच्या पहिल्या महिन्याच्या पहिल्या आठवडयात,तीन महिन्याच्या कालावधीसाठी अग्रिम स्वरुपात चुकते करील. खाटा वापरण्याच्या कालावधीत शासन ठरविल ते सुधारीत शुल्क त्या दिनांकापासून चुकते करण्याचे संस्थेवर बंधनकारक राहिल. तसे न केल्यास ही व्यवस्था रद्द करण्यात येईल व याबाबतचा शासनाचा निर्णय अंतिम राहिल.

२) उपरोक्त दिनांक ०३.०८.१९९० येथील शासन निर्णयासोबत जोडलेल्या करारपत्राच्या विहित नमून्याप्रमाणे संस्थेने उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद यांचे समवेत करारपत्र करुन ते नोंदणीकृत करुन घ्यावे व या करारपत्रातील कोणत्याही अटींचे पालन न केल्यास किंवा अटीचा भंग झाल्यास ही व्यवस्था रद्द करण्यात येईल व याबाबतचा शासनाचा निर्णय अंतिम असेल.

३) या संदर्भात सार्वजनिक आरोग्य विभाग आणि वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्य विभाग ह्यांनी वेळोवेळी निर्देशीत केल्याप्रमाणे अन्य अटी व शर्तींचे पालन करणे संस्थेवर बंधनकारक राहिल.

२. उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर यांनी विहित अटी व शर्तीच्या अधिन राहून संबंधीत संस्थेकडून करारपत्र करुन, शैक्षणिक प्रयोजनार्थ प्रत्याक्षिक अनुभवाकरीता या शासन निर्णयाच्या दिनांकापासून ३ वर्षाकरीता म्हणजेच दि. १९ सप्टेंबर, २०१८ ते दि.१८ सप्टेंबर, २०२१ पर्यंत परवानगी द्यावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९१०१८४५२८७४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra
Shamraoji
Kaurte

Digitally signed by Rajendra Shamraoji Kaurte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ed4c738df60ac2ac776b9e2481f77ad50aba9dc28bb31a482e03c7ee7b6f64d8, serialNumber=7caa550613a8c4cb7c593368faa24e20d6f8985f510118e6fc1af8b04a443ee8, cn=Rajendra Shamraoji Kaurte
Date: 2018.09.19 13:00:04 +05'30'

**रा.शा.कौरते**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई नागपूर.

२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.

३. सहसंचालक,आरोग्य सेवा (वैद्यकीय), मुंबई.

४. सहसंचालक, आरोग्य सेवा (आरोग्य) पुणे.

५. उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर.

६. जिल्हा शल्य चिकित्सक, कोल्हापूर.

७. प्राथमिक आरोग्य केंद्र कामेरी/वाळवा/पेठ/कासेगांव/ बावची/कुरळप/येडेमच्छिंद्र, ता. वाळवा, जि. सांगली.

८. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर.

९. .प्रकाश इन्स्टियुट ऑफ सायनसेस ॲन्ड रिसर्च महाविद्यालय उरण-इस्लामपूर, ता. वाळवा, जि. सांगली.

१०.वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.

११. निवडनस्ती (आरोग्य-४)